महानगरपालिकेतील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,

परिपत्रक क्रमांक :जीईएन-१०९८/प्र.क्र.२/९८/नवि-२४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- 9 जानेवारी, १९९८

## परिपत्रक

शहर अभियंता, आरोग्य वैद्यकीय अधिकारी, प्रमुख हिशेब तपासनीस, उप आयुक्त, सहायक आयुक्त या पदावर महानगरपालिकेने राज्य शासनाच्या मान्यतेने योग्य उमेदवाराची नियुक्ती करावी अशी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५[१] ते [४] मध्ये तरतूद करण्यात आलेली आहे. वरीलपैकी एखाद्या पदावरील नियुक्तीस, सदरहू अधिनियमाच्या कलम ४५[४] नुसार शासनाने मंजुरी न दिल्यास संबंधित अधिकाऱ्यास तात्काळ त्या पदावरून काढून टाकण्यात यावे व अशा तऱ्हेने रिक्त झालेल्या पदावर महानगरपालिकेने कलम ४५ [५] नुसार ३० दिवसांच्या आत अन्य योग्य उमेदवाराची नियुक्ती करावी अशीही सदरहू अधिनियमात तरतूद आहे. तसेच कलम ४५[५] मध्ये अशीही तरतूद करण्यात आलेली आहे की, वरीलपैकी कोणत्याही रिक्त पदावर ते पद रिक्त झाल्यापासून ४ महिन्याच्या आत किंवा शासनाने ४५[४] खालीलप्रमाणे मंजुरी नाकारल्यास ३० दिवसांच्या आत महानगरपालिका या पदावर योग्य उमेदवाराची नियुक्ती करील आणि जर कलम ४५[५] प्रमाणे विहित मुदतीत महानगरपालिकेने कार्यवाही केली नाही तर कलम ४५[६] खाली प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करून अशा रिक्त पदावर शासन योग्य उमेदवाराची नियुक्ती करेल.

०२. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५१[४] खालील तरतुदीनुसार दरमहा ८०० रूपयेपेक्षा जास्त पगाराचे कोणतेही नवीन कायम पदाच्या निर्मितीसाठी शासनाची मान्यता आवश्यक असते.

०३. तसेच मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५३ मधील तरतुदीनुसार रू.४०० पेक्षा जास्त वेतन असलेल्या कोणत्याही पदावरील अधिकाऱ्यांची तात्पुरती किंवा कायमची नियुक्ती करण्याचे अधिकार महानगरपालिकेकडे आहेत. महानगर पालिका आयुक्त अशा पदावरील अधिकाऱ्यांची सहा महिन्यापेक्षा जास्त नसलेल्या कालावधीसाठी स्थायी समितीच्या पूर्व मान्यतेने नियुक्ती करू शकतात. तथापि त्यांनी त्याबाबत महानगरपालिकेला तात्काळ माहिती देणे आवश्यक ठरते व
अशी कोणतीही नियुक्ती महानगरपालिकेच्या .....

मान्यतेशिवाय सहा महिन्याचे पुढे चालू राहू शकत नाही.

०४. वरील तिन्ही परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या बाबींबद्दल समांतर तरतुदी मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ चे कलम ७३ अ ते ८० अ तसेच नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम १९४८ च्या कलम ४९ ते ५१ मध्ये करण्यात आलेल्या आहेत.

०५. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, कायद्यामध्ये वरील प्रमाणे जरी अतिशय स्पष्ट तरतुदी असल्या तरी ब-याचशा महानगरपालिकेकडून त्या काटेकोरपणे पाळल्या जात नाहीत. उपरोक्त पदावरील नियुक्त्या करण्याबाबतचे ठराव महानगरपालिकेकडून केले जातात व त्यानुसार संबंधित अधिकारी त्या पदाचा कार्यभारही स्वीकारतात. मात्र त्यांच्या नियुक्तीचा ठराव ब-याचवेळा शासनाकडे वेळेवर न पाठविता यथावकाश कधीतरी मंजुरीसाठी पाठविले जातात व शासनाने मंजुरी नाकारली तरी त्या अधिका-यास लगेच दूर केले जात नाही. त्यामुळे शासनाची मंजुरी हा फक्त एक शिष्टाचार झाल्यासारखे वाटते. त्याशिवाय शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की, कधी कधी महानगरपालिकेने केलेल्या ठरावामध्ये उणीवाही असतात जसे की, सेवाज्येष्ठता, पात्रता, आरक्षण इत्यादी गोष्टी लक्षात न घेता ठराव केलेले असतात. त्यामुळे महानगरपालिकेच्या ठरावानुसार अपात्र उमेदवार नियुक्त होऊन त्या पदावर चालू राहतात. तसेच प्रतिनियुक्तीवर घेतलेल्या अधिका-यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी महानगरपालिकेच्या परवानगीशिवाय अनुज्ञेय मुदतीच्या पुढे चालूच असतो किंवा प्रतिनियुक्तीला महानगरपालिकेकडून वेळीच मान्यता घेतली जात नाही. रुपये ८०० पेक्षा जास्त पगाराचे कोणतेही नवीन पद शासनाच्या मंजुरीशिवाय निर्माण करू नये या नियमाचे देखील तंतोतंत पालन होत नाही. त्याशिवाय महानगरपालिका आस्थापनेवरील कोणत्याही अधिका-याचे वेतनश्रेणीत बदल करावयाचा झाल्यास त्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५[३] खालील तरतुदीप्रमाणे शासनाच्या मान्यतेची आवश्यकता आहे. परंतु काही ठिकाणी ती घेतली नसल्याचे आढळून आले आहे. वरील सर्व बाबी प्रशासकीय व वैधानिक दृष्टीनेही योग्य नाहीत असे शासनाचे स्पष्ट मत आहे.

०६. तरी वरीलपैकी कोणत्याही प्रकारची अनियमितता होऊ नये म्हणून या परिपत्रकाव्दारे शासन सर्व महानगरपालिका आयुक्तांना/महानगरपालिकांना अशा सूचना देत आहे की, वरीलपैकी कोणत्याही पदाच्या निर्मितीबाबत अथवा कोणत्याही पदावरील नियुक्तीबाबत किंवा वेतनश्रेणीत सुधारणा करण्याबाबत काहीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. त्यासाठी प्रत्येकवेळी विहित मुदतीत कार्यवाही करून आवश्यक तेथे शासनाकडे मंजुरीसाठी प्रस्ताव पाठवून त्याचा पाठपुरावा करावा. अशात-हेच्या कोणत्याही प्रकरणात अनियमितता घडल्यास संबंधित महानगरपालिका आयुक्त तसेच महानगरपालिकेस जबाबदार धरण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ नंद लाल ]
सचिव
नगर विकास विभाग

प्रति,

सर्व महानगरपालिकाचे आयुक्त,

सर्व महानगरपालिकाचे नगर सचिव,

सर्व महानगरपालिकाचे मुख्य लेखाधिकारी,

नगर विकास विभाग, कार्यासन क्र. नवि-२१, नवि-२२, नवि-२३, नवि-२४, नवि-२५, नवि-२६ व नवि-३२